गुन्हे प्रकटीकरण शाखा, गुन्हे अन्वेषण विभाग, मुंबई गु.र.क्र.६/२००४ (मलबार हिल पो. ठाणे गु.र.क्र. ९३/२००३) अन्वये दाखल गुन्हयातून उद्भवणा-या न्याय प्रकरणात मा. महानगर दंडाधिकारी न्यायालय, मुंबई, मा. सत्र न्यायालय, मुंबई व मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे न्यायालयीन कामकाज हाताळण्यासाठी विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून यापूर्वी केलेली ॲड. श्री. राजा ठाकरे यांची नियुक्ती रद्द करुन त्यांच्या ऐवजी विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त करण्यात आलेल्या ॲड. श्री. अवधूत चिमलकर यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एसपीपी ०३२०/प्र .क्र.४०/पोल-१०**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
२ रा मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक: २१ ऑक्टोबर, २०२०

संदर्भ :- (१) विधी व न्याय विभाग, शासन आदेश क्र. एसपीपी.२०२०/यु.ओ.आर.१७/का-१४. दिनांक २७ ऑगस्ट, २०२०

(२) वित्त विभाग,शासन निर्णय क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम, दिनांक २९ जुलै, २०१५.

(३) वित्त विभाग,शासन निर्णय क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम, दिनांक १६ जून, २०१७.

प्रस्तावना :-

गुन्हे प्रकटीकरण शाखा, गुन्हे अन्वेषण विभाग, मुंबई गु.र.क्र.६/२००४ (मलबार हिल पो. ठाणे गु.र.क्र. ९३/२००३) अन्वये दाखल गुन्हयातून उद्भवणा-या न्याय प्रकरणात मा. महानगर दंडाधिकारी न्यायालय,मुंबई, मा. सत्र न्यायालय,मुंबई व मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे न्यायालयीन कामकाज हाताळण्यासाठी विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून यापूर्वी केलेली ॲड. श्री. राजा ठाकरे यांची नियुक्ती रद्द करुन त्यांच्या ऐवजी ॲड. श्री. अवधूत चिमलकर यांची संदर्भ क्र. १ वरील विधी व न्याय विभागाच्या दिनांक २७.०८.२०२० च्या शासन आदेशान्वये नियुक्ती करण्यात आली आहे.

मा. महानगर दंडाधिकारी न्यायालय, मुंबई, मा.सत्र न्यायालय, मुंबई व मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे शासनाच्या वतीने न्यायालयीन कामकाज हाताळणा-या ॲड. श्री. अवधूत चिमलकर यांना व्यावसायिक फी अदा करण्याची बाब शासन विचाराधीन होती.

**शासन निर्णय : -**

गुन्हे प्रकटीकरण शाखा, गुन्हे अन्वेषण विभाग, मुंबई गु.र.क्र.६/२००४ (मलबार हिल पो. ठाणे गु.र.क्र. ९३/२००३) अन्वये दाखल गुन्हयातून उद्भवलेल्या मा. महानगर दंडाधिकारी न्यायालय, मुंबई, मा. सत्र न्यायालय, मुंबई व मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल न्यायालयीन प्रकरणात विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त करण्यात आलेल्या ॲड. श्री. अवधूत चिमलकर यांना खालीलप्रमाणे व्यावसायिक फी अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

**मा. महानगर दंडाधिकारी न्यायालय, मुंबई, मा. सत्र न्यायालय, मुंबई व मा. उच्च न्यायालय, मुंबई**

अ) प्रतिदिन परिणामकारक सुणावणी फी रु. ३५,०००/-(रुपये पस्तीस हजार फक्त)

ब) विचारविनिमय फी रु. ५,०००/- प्रति तास (किमाल प्रतिदिन रु.१५,०००/-)

२. ॲड. श्री. अवधूत चिमलकर यांना अनुज्ञेय असलेल्या व्यावसायिक फीचे प्रदान दर दोन महिन्याच्या न्यायालयीन कामकाजानंतर करण्यात यावे. मा. न्यायालयीन कामकाजाचे परिणाम-कारक सुनावणीचे दिवस संबंधीत प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिकाऱ्याकडून तसेच संबंधित मा. न्यायालयाच्या प्रबंधकांकडून तपासून, प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान ॲड. श्री. अवधूत चिमलकर यांना होणार नाही, याची दक्षता संबंधित पोलिस उपायुक्तांनी घ्यावी.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस - (००) (१०८), राज्य पोलीस मुख्यालय (०२) (०१) शहर पोलीस आस्थापना - (२०५५ ००९७) २८ व्यावसायिक व विशेष सेवा या लेखाशीर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र.३८१/२०/व्यय-७, दि. ५/१०/२०२० अन्वये मिळालेल्या शासन मान्यतेनुसार तसेच शासन निर्णय क्र. विअप्र-२०१५/ प्र.क्र.२१/२०१५/ विनियम,दिनांक २९.०७.२०१५ तसेच दिनांक १६/०६/२०१७ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१०२११५३१२४८६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kishor Shyamrao Bhalerao

Digitally signed by Kishor Shyamrao Bhalerao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a9c66c37cf4df25ecf07a096af23d69cb2e83d31183e8f9d61db36e6ca846c9e, serialNumber=94524ab889e2fa9e6bfe5e1e58426881bc36b968ffd0f45ce2d4bd3ff527ded2, cn=Kishor Shyamrao Bhalerao
Date: 2020.10.21 15:33:19 +05'30'

**( किशोर भालेराव )**
**उप सचिव (विधि), गृह विभाग,**

**प्रत:-**

१. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
२. सह पोलीस आयुक्त (गुन्हे), बृहन्मुंबई.
३. पोलीस उपायुक्त(प्रकटीकरण), गुन्हे शाखा, मुंबई.
४. वरीष्ठ पोलीस निरीक्षक, गुन्हे प्रकटीकरण शाखा, कक्ष-२,गु.अ.वि., मुंबई.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई.
६. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. ॲड.श्री. अवधूत चिमलकर, ३०१,मारुती मेशन,१७ रघुनाथ दाजी मार्ग, फोर्ट, मुंबई.
९. विधी व न्याय विभाग (अ शाखा), मंत्रालय, मुंबई.
१०. निवड नस्ती (पोल-१०).